61/D/D:\Bolade-1\Prt-2\G.R/ 29-1

**असोसिएट महाअधिवक्ता यांच्या शासकीय वाहनावर लाल दिवा अनुज्ञेय करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
गृह विभाग.
शासन निर्णय क्र.: एमव्हीआर १३०५/८९/प्र.क्र.१३/परि.२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक : ११ एप्रिल, २००५.

**प्रस्तावना :-** केंद्रिय मोटार वाहने नियम, १९८९ च्या नियम १०८ मधील तरतुदीनुसार राज्य शासनास अति महत्वाच्या व्यक्तींच्या शासकीय वाहनावर लाल / अंबर दिवा लावण्यास परवानगी देण्याचे अधिकार आहेत. शासन निर्णय, क्रमांक: एमव्हीआर १३९७/९९५/सीआर-३७/परिवहन.२, दिनांक ३ जुलै, १९९७ अन्वये अतिरिक्त महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य यांच्या शासकीय वाहनावर लाल दिवा सुविधा अनुज्ञेय करण्यात आली होती. सदर पदाचे ऐवजी असोसिएट महाअधिवक्ता (सहायक अभियोक्ता) हे पद घटनेच्या अनुच्छेद १६२ अन्वये दिनांक १५ डिसेंबर, २००४ च्या अधिसुचनेन्वये निर्माण करण्यात आले आहे. त्यामुळे अतिरिक्त महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य यांच्या वाहनावर लाल दिवा बसविण्यास परवानगी होती, त्याऐवजी असोसिएट महाअधिवक्ता (सरकारी अभियोक्ता) यांच्या वाहनावर लाल दिवा अनुज्ञेय करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** शासन निर्णय, दिनांक ३ जुलै, १९९७ अन्वये अनुज्ञेय असलेली अतिरिक्त महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य यांच्या वाहनावरील लाल दिव्याची सुविधा रद्द करण्यात येत असुन त्याऐवजी सहायक अभियोक्ता यांच्या शासकीय वाहनावर लाल दिवा सुविधा अनुज्ञेय करण्यात येत आहे.

या निर्णयाची अंमलबजावणी शासन निर्णय, क्रमांक: एमव्हीआर १३९७/९९५/सीआर-३७/परि.२, दिनांक ३ जुलै, १९९७ व शासन परिपत्रक क्र. एमव्हीआर १३९७/९९५/प्र.क्र.३७/परि.२, गृह विभाग, दिनांक ११.२.१९९८ मधील नमुद कार्यपध्दतीप्रमाणे करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( रमेश शिंदे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रती,

मा. राज्यपालांचे सचिव
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
सर्व अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
सर्व प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
निबंधक, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई.
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व प्रादेशिक/ उप प्रादेशिक परिवहन अधिकारी.
असोसिएट महाअधिवक्ता (सहायक अभियोक्ता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व पोलीस आयुक्त.
सर्व पोलीस अधिक्षक.
सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक.
अपर पोलीस महासंचालक (वाहतुक), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
प्रबंधक, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई.
अपर पोलीस आयुक्त (वाहतुक), मुंबई.